सातव्या वेतन आयोगाप्रमाणे मा. राज्य मुख्य माहिती आयुक्त व मा. राज्य माहिती आयुक्त यांचे वेतन सुधारित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण२०१७/प्र.क्र.२३१/कार्या-सहा,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक २८ नोव्हेंबर, २०१८**

**वाचा :-** शासन निर्णय , सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआयसी- २००६/ १३२२/ सीआर०४/ ०७/ ५, दिनांक ७.९.२००७ चे दोन स्वतंत्र शासन निर्णय.

**प्रस्तावना** :-

माहितीचा अधिकार अधिनियम २००५ मधील कलम १६(५)(क) नुसार राज्य मुख्य माहिती आयुक्त यांचे वेतन व भत्ते क्रेंद्रीय निवडणूक आयुक्ताप्रमाणे असतील व कलम १६(५)(ख) नुसार राज्य माहिती आयुक्त यांचे वेतन व भत्ते राज्याच्या मुख्य सचिवांप्रमाणे असतील अशी तरतूद आहे. उपरोक्त नमुद दिनांक ७.९.२००७च्या दोन स्वतंत्र शासन निर्णयान्वये राज्य मुख्य माहिती आयुक्त व राज्य माहिती आयुक्त यांच्या सेवा शर्ती निर्गमित करण्यात आल्या आहेत. सातव्या वेतन आयोगाप्रमाणे मा. राज्य मुख्य माहिती आयुक्त व मा. राज्य माहिती आयुक्त यांचे वेतन सुधारित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

सातव्या वेतन आयोगानुसार दिनांक १ जानेवारी, २०१६ पासून "राज्य मुख्य माहिती आयुक्त" या पदास रु.२,५०,०००/-(निश्चित) (Level १८ in Pay Matrix) इतके व "राज्य माहिती आयुक्त" या पदास रु. २,२५,०००/-(निश्चित) (Level १७ in Pay Matrix)इतके वेतन मंजूर करण्यात येत आहे.

२. मा. राज्य मुख्य माहिती आयुक्त व मा. राज्य माहिती आयुक्त यांना या पदाकरिता मिळणाऱ्या एकूण वेतनातून त्यांना दरमहा अनुज्ञेय असलेले निवृत्तीवेतन अंशराशीकृत निवृत्ती वेतनाच्या रक्कमेसह वजा करण्यात येऊन शिल्लक रक्कम त्यांना अदा करण्यात यावी.

३. मा. राज्य मुख्य माहिती आयुक्त यांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआयसी-२००६/१३२२/प्र.क्र.०४/०७/५, दि.७.९.२००७ अनुसार व वेळोवेळी सुधारणा केल्याप्रमाणे महागाई भत्ता, अतिथ्य भत्ता, रजा, निवासस्थान, वैद्यकीय सुविधा, स्थानिक पूरक भत्ता वाहन, टेलीफोन आणि रजा प्रवास सवलत या सोयी सुविधाअनुज्ञेय असतील.

४. मा. राज्य माहिती आयुक्त यांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआयसी-२००६/१३२२/प्र.क्र.०४/०७/५, दि.७.९.२००७ अनुसार व वेळोवेळी सुधारणा केल्याप्रमाणे महागाई भत्ता, रजा, निवासस्थान, वैद्यकीय सुविधा, स्थानिक पूरक भत्ता वाहन, टेलीफोन आणि रजा प्रवास सवलत या सोयी सुविधाअनुज्ञेय असतील.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२१९/२०१८/सेवा-९, दिनांक १०.१०.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२८१६४५११५६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chhaya Kiran Wadte

Digitally signed by Chhaya Kiran Wadte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f311bd8712a7b94b3b73d0e88ad01cf3a49c098bcd5f62e16e7135388baa523c, serialNumber=5bac345149360802f8cd3e4ab4ec174f2fec1bff420e81931e638ee6cdfcc12d, cn=Chhaya Kiran Wadte
Date: 2018.11.28 17:08:18 +05'30'

**( छा. कि. वडते )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
४. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) -१/२, महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल ( लेखा परिक्षा )-१/२ महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
६. सचिव, महाराष्ट्र राज्य माहिती आयोग,१३ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
७. उपसचिव, राज्य माहिती आयोग, बृहन्मुंबई/ कोकण/ पुणे/ नाशिक/ अमरावती/ औरंगाबाद/ नागपूर
८. कार्यासन सहा संग्रहार्थ.